**मंगळवार, दिनांक २० मार्च, २०१८ रोजी मध्य रेल्वे मार्गावरील माटुंगा-दादर रेल्वे स्थानकांदरम्यान रेल्वे भरतीसंदर्भात विद्यार्थ्यांनी केलेल्या रेल रोको आंदोलनामुळे या दिवसाची विशेष नैमित्तिक रजा मंजूर करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः विनैसु-१५१८/ई-३०३२९३९/प्र.क्र.१३८/२९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २६ डिसेंबर, २०१८

**परिपत्रक :**

मंगळवार, दिनांक २० मार्च,२०१८ रोजी मध्य रेल्वे मार्गावरील माटुंगा-दादर रेल्वे स्थानकांदरम्यान रेल्वे भरतीसंदर्भात विद्यार्थ्यांनी केलेल्या रेल रोको आंदोलनामुळे मध्य मार्गावरील रेल्वे वाहतूक विस्कळीत झाली. त्यामुळे बहुसंख्य राज्य शासकीय अधिकारी/ कार्यालयात उपस्थित राहू शकले नाहीत, अशा मध्य रेल्वेमार्गावरील निवासस्थान असल्याने अनुपस्थित राहिलेल्या अधिकारी/कर्मचा-यांना मंगळवार, दिनांक २० मार्च, २०१८ रोजी विशेष नैमित्तिक रजा देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. याबाबत शासनाने असा निर्णय घेतला आहे की, मध्ये रेल्वेमार्गावर निवासस्थान असलेले जे राज्य शासकीय अधिकारी/कर्मचारी मंगळवार, दिनांक २० मार्च,२०१८ रोजी वर उल्लेखित कारणामुळे त्यांच्या कार्यालयात उपस्थित राहू शकले नाहीत, अशा अधिकारी/कर्मचा-यांना त्या दिवसाची विशेष नैमित्तिक रजा मंजूर करण्यात यावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८१२२६१२२५१६७१०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Kisan Wavhal
Digitally signed by Mahesh Kisan Wavhal
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400027, st=Maharashtra, 2.5.4.20=20283e5186ccca8f0350182971072649a1b738829e2db98425839104e8e271f1, cn=Mahesh Kisan Wavhal
Date: 2018.12.26 12:34:18 +05'30'

( म.कि. वाव्हळ )
अवर सचिव

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
४. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
५. प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

६. प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

८. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

९. जिल्हाधिकारी मुंबई शहर/मुंबई उपनगर/ठाणे,

१०. प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

११. आयुक्त, महानगरपालिका, मुंबई,

१२. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई,

१३. महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई,

१४. उपमहालेखापाल, भविष्य निर्वाह निधी कक्ष, मुंबई,

१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,

१७. उपसचिव (आस्थापना), मंत्रालयीन सर्व विभाग,

१८. निवडनस्ती, कार्यासन-२९.